भारतीय संविधानातील नागरिकांच्या मुलभूत कर्तव्याच्या जागरुकतेसाठी दिनांक २६ नोव्हेंबर, २०१९ ते दि.२६ नोव्हेंबर, २०२० या एक वर्षाच्या कालावधीत "नागरिकांचे मुलभूत कर्तव्य जागरुकता मोहिम" राबविणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक संकिर्ण -२०१९/१३०/समन्वय**
मंत्रालय, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०० ०३२.
दिनांक २२ नोव्हेंबर, २०१९

वाचा : १) सामान्य प्रशासन विभाग शासन परिपत्रक क्र.जपुती २२१५/केईरा-४२/प्र.क्र.४१५/२९ दिनांक २४.११.२०१५

२) केंद्र शासनाचे पत्र क्र.D.O.No.४०३/१/२/२०१५-CA.V, Dated 25.10.2019.

३) केंद्रिय मंत्रीमंडळ सचिव यांनी संविधान दिन साजरा करण्या संदर्भात दि.२.११.२०१९ रोजी आयोजित केलेल्या व्हिडीओ कॉन्फरन्स द्वारे दिलेल्या महत्वाच्या सुचना.

४) केंद्र शासनाचे पत्र क्र.D.O.No.A2J/Events/02/2014, Dated 13.11.2019.

५) केंद्र शासनाचे पत्र क्र.F.No.16-8/2019-IS.5 Dated 16.11.2019

६) केंद्र शासनाचे पत्र क्र.D.O.No.A2J/Events/02/2014, Dated 18.11.2019.

## परिपत्रक

दिनांक २६ नोव्हेंबर, १९४९ या दिवशी भारताचे संविधान अंगिकृत आणि अधिनियमित करुन स्वत:प्रत अर्पण करण्यात आले. भारतीय संविधान निर्मितीमधील संस्थापकांच्या योगदानाचा उचित सन्मान व्हावा म्हणून दिनांक २६ नोव्हेंबर हा दिवस दरवर्षी "संविधान दिन" म्हणून साजरा करण्यात येतो. भारतीय संविधानाबाबत जनजागृती आणि सर्व नागरिकांना संविधानाची ओळख व्हावी याकरिता राज्यात दरवर्षी सर्व शासकीय व निमशासकीय कार्यालय, जिल्हा परिषदा, पंचायत समित्या, महानगरपालिका, नगरपालिका, ग्रामपंचायती, महाराष्ट्रातील सर्व प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळा व महाविद्यालयांमध्ये संविधानाच्या उद्देशिकेचे (Preamble) सामुहिक वाचन करण्याबाबत सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ च्या दि.२४.११.२०१५ च्या शासन परिपत्रकान्वये दिलेल्या सुचनानुसार याही वर्षी दि.२६.११.२०१९ रोजी सकाळी ११.०० वा. संविधानाच्या उद्देशिकेचे (Preamble) वाचन राज्यातील सर्व शासकीय/निमशासकीय कार्यालये, जिल्हापरिषदा, ग्रामपंचायती, पंचायत समित्या, महानगरपालिका, नगरपालिका, सर्व प्राथमिक,

माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळा व महाविद्यालयांमध्ये करावयाचे आहे. सुलभ संदर्भासाठी संविधानाची उद्देशिका (Preamble) <u>**सोबत परिशिष्ट-अ**</u> येथे जोडत आहे.

२. भारताचे संविधान अंगिकृत आणि अधिनियमित करुन स्वत:प्रत अर्पण करण्याच्या घटनेला सन २०१९ या वर्षी ७० वर्ष पुर्ण होत आहेत. त्यानुषंगाने भारतीय संविधानातील नागरिकांचे मुलभूत कर्तव्य यावर लक्ष केंद्रीत करुन दिनांक २६ नोव्हेंबर, २०१९ ते दि.२६ नोव्हेंबर, २०२० या एक वर्षाच्या कालावधीत जागरुकता मोहिम राबविणेबाबत केंद्र शासनाने संदर्भाधीन क्र.४ दिनांक १३.११.२०१९ च्या पत्रान्वये निर्देश दिले आहेत. सदर मोहिम राबवितांना विविध विभागांनी कार्यवाही करावयाच्या मुद्यांबाबतचा (मुद्दा क्र.१ ते १२) तपशीलही केंद्र शासनाच्या दि.१३.११.२०१९ रोजीच्या पत्रासोबत उपलब्ध करुन देण्यात आला आहे. त्यानुसार दि.२६ नोव्हेंबर, २०१९ पासून पुढील वर्षभर राबविण्यात येणाऱ्या जागरुकता मोहिमेमध्ये विविध विभागांनी त्यांच्यांशी संबंधीत मुद्यांचा जागरुकता मोहिमेमध्ये समावेश करुन त्याप्रमाणे कार्यवाही करावी. महाराष्ट्र राज्यातील प्रत्येक विभागांनी करावयाच्या कार्यवाहीबाबत सोबतच्या <u>**परिशिष्ट-ब**</u> मध्ये सविस्तरपणे माहिती दिलेली आहे. त्यानुसार संबंधीत विभागांनी कार्यवाही करावी.

३. सदर मोहिम राबविण्यासाठी करावयाच्या प्रचार व प्रसिध्दीसाठी शैक्षणिक व माहितीपर प्रसारणाशी संबंधीत साहित्य उदा.माहितीपुस्तिका, पोस्टर, चित्रफित, बोधचिन्ह (Logo), पत्रके इत्यादी आवश्यक असलेले साहित्य केंद्र शासनाच्या माहिती व प्रसारण मंत्रालयाच्या संकेत स्थळावर (Website of the Ministry of Information and Broadcasting (MoI&B) व केंद्र शासनाच्या न्याय विभागातील संकेतस्थळावर (Website of Department of Justice (www.doj.gov.in )) उपलब्ध केला जाईल. या मोहिमे दरम्यान घ्यावयाच्या शपथेचा नमुना केंद्र शासनाच्या न्याय विभागाकडून उपलब्ध केला जाईल.

तसेच या मोहिमे अंतर्गत शाळा, कॉलेज व इतर केंद्र या ठिकाणी सदर विषयावर आयोजित करावयाच्या भाषण, चर्चासत्र यासाठी नेमणुक केलेल्या व्यक्तीबाबतची यादीसुध्दा केंद्र शासनाच्या न्याय विभागाच्या संकेतस्थळावर (Website of Department of Justice (www.doj.gov.in )) उपलब्ध करण्यात येईल.

४. नागरिकांचे मुलभूत कर्तव्याच्या जागरुकतेबाबतची मोहिम राज्यात राबविण्यासाठी आयुक्त, समाज कल्याण, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे यांची समन्वय अधिकारी (नोडल ऑफिसर) म्हणून नियुक्ती करण्यात येत आहे. त्याचप्रमाणे सदरची मोहिम जिल्हयांमध्ये राबविण्यासाठी संबंधीत जिल्हयाचे जिल्हाधिकारी यांची समन्वय अधिकारी (नोडल ऑफिसर) म्हणून नियुक्ती करण्यात येत

आहे. जिल्हाधिकारी यांनी त्यांचे जिल्हयातील सर्व विभागाचे अधिकारी यांच्याशी समन्वय साधून संविधाना विषयी जनजागरुकता मोहिम त्यांच्या जिल्हयात राबवावी.

५. "नागरिकांचे मुलभूत कर्तव्य जागरुकता मोहिम" या मोहिमेची परिणामकारक अंमलबजावणी होण्यासाठी राज्य शासनाच्या प्रत्येक विभागातील सर्व कार्यालये व संस्था यांचा समावेश करुन या मोहिमे अंतर्गत आयेजित करावयाच्या कार्यक्रमांबाबतचा दि.२६ नोव्हेंबर पासून एक वर्षाचा (प्रत्येक महिन्याचा) तारीखवार आराखडा संबंधीत विभागाने तयार करावा व त्याची प्रत सामाजिक न्याय विभाग व सामान्य प्रशासन विभागास पाठवावी. दि.२६ नोव्हेंबर, २०१९ तथा त्यानंतर वर्षभर मोहिमे अंतर्गत राबविण्यात आलेल्या कार्यक्रमाचा तपशील वेळोवेळी फोटोसह संबंधीत विभाग, जिल्हाधिकारी तथा राज्याचे समन्वय अधिकारी यांनी केंद्र शासनाच्या न्याय विभागाच्या (www.doj.gov.in) या संकेतस्थळावर अपलोड करावा.

६. या जागरुकता मोहिमेसाठी केंद्र शासनाच्या न्याय विभागातील खालील अधिकारी समन्वयक म्हणून घोषित करण्यात आलेले आहेत.

अ) श्रीमती सुषमा तायशेटे, सह सचिव Email : jsst-doj@gov.in Landline : 011 -23385020

ब) श्री.शैलेश श्रीवास्तव, संचालक Email : dir1-doj@gov.in, Landline : 011 -23072135, Mob.No.09870440735

७) या अंतर्गत येणारा खर्च राज्य शासनाच्या त्या त्या विभागामधील उपलब्ध असलेल्या कार्यालयीन खर्च तथा विविध योजनांमध्ये उपलब्ध निधीतून संबंधीत विभागांनी करावा.

सदरहू शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संकेताक २०१९११२२१६५६२६९६२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

AJOY MEHTA

Digitally signed by AJOY MEHTA
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=6cd985f04d38fef505754856131307df708dca9bbcea90df80882d2257d79126, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=85c1fa2cdc7cf754bc479fb6ae97bc65889de163fa7e4c775fec1ed9e37334f3, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=AJOY MEHTA
Date: 2019.11.22 18:07:29 +05'30'

**(अजोय मेहता)**
**मुख्य सचिव**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा.मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

३. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग,
४. प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई.
५. सचिव, राज्य निवडणुक आयोग, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६. सचिव, राज्य महिती आयुक्तालय, महराष्ट्र राज्य, मुंबई
७. सचिव, राज्य मानवाधिकार आयोग, महाराष्ट्र राज्य, मुंबई
८. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा अयोग, महाराष्ट्र राज्य, मुंबई
९. प्रबंधक, मुंबई उच्च न्यायालय,मुंबई/नागपूर/औरंगाबाद खंडपीठ,
१०.कुलपती, राज्यातील सर्व विद्यापीठे
११.प्रबंधक, लोकायुक्त व उपलोकायुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१२.महालेखापाल-१, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१३.महालेखापाल-२, महाराष्ट्र राज्य, नागपूर
१४. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१५. सर्व मंत्रालयीन विभाग,
१६. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई (आवश्यक ती प्रसिध्दी देण्यासाठी)
१७. सर्व विभागीय आयुक्त,
१८. सर्व जिल्हाधिकारी,
१९. सर्व जिल्हापरिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
२०. सर्व आयुक्त, महानगरपालिका
२१.सर्व मुख्याधिकारी, नगरपरिषद/नगरपालिका,
२२. विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस मार्ग, नवी दिल्ली.
२३. निवडनस्ती कार्यासन समन्वय,

परिशिष्ट- "अ"

# भारताचे संविधान

## उद्देशिका

**आम्ही, भारताचे लोक, भारताचे एक सार्वभौम**
**समाजवादी धर्मनिरपेक्ष लोकशाही गणराज्य** घडविण्याचा
व त्याच्या सर्व नागरिकांस:
सामाजिक, आर्थिक व राजनैतिक **न्याय** ;
विचार, अभिव्यक्ती, विश्वास,श्रध्दा
व उपासना यांचे **स्वातंत्र्य** ;
दर्जाची व संधीची **समानता** ;
निश्चितपणे प्राप्त करुन देण्याचा
आणि त्या सर्वांमध्ये व्यक्तीची प्रतिष्ठा
व राष्ट्राची एकता आणि एकात्मता
यांचे आश्वासन देणारी **बंधुता**
प्रवर्धित करण्याचा संकल्पपूर्वक निर्धार करुन;
**आमच्या संविधानसभेत**
आज दिनांक २६ नोव्हेंबर, १९४९ रोजी
**याद्वारे हे संविधान अंगीकृत आणि अधिनियमित**
**करुन स्वत:प्रत अर्पण करीत आहोत.**

# THE CONSTITUTION OF INDIA

## PREAMBLE

**WE, THE PEOPLE OF INDIA,** having solemnly resolved
to constitute India into a **SOVEREIGN SOCIALIST SECULAR DEMOCRATIC REPUBLIC** and to secure to all its citizens:

**JUSTICE,** social, economic and political;
**LIBERTY** of thought, expression, belief, faith and worship;
**EQUALITY** of status and of opportunity;

and to promote among them all

**Fraternity** assuring the dignity of the individual and the unity and integrity of the Nation;

**IN OUR CONSTITUENT ASSEMBLY** this twenty-sixth day of November, 1949, do **HEREBY ADOPT, ENACT AND GIVE TO OURSELVES THIS CONSTITUTION**.

परिशिष्ट "ब"

**भारतीय संविधातील नागरिकांच्या मुलभूत कर्तव्याच्या जागरुकतेसाठी दिनांक २६ नोव्हेंबर, २०१९ ते दि.२६ नोव्हेंबर, २०२० या एक वर्षाच्या कालावधीत "नागरिकांचे मुलभूत कर्तव्य जागरुकता मोहिम" राबविणेबाबत. राज्यातील विविध विभागाच्या जबाबदाऱ्या.**

| अ.क्र. | संबंधीत विभाग | कार्यक्रमाचा तपशील |
|---|---|---|
| १. | नगर विकास विभाग | • नागरी स्थानिक स्वराज्य संस्था (महापालिका/ नगरपरिषद/नगरपालिका/नगरपंचायत/कटक मंडळे) यांनी दिनांक २६ नोव्हेंबर, २०१९ ते दि.२६ नोव्हेंबर, २०२० या एक वर्षाच्या कालावधीत सेमिनार घ्यावेत. स्वयं सहाय्यता बचत गट, युवा मंडळे यांच्या बैठका आयोजित कराव्यात.<br>• महानगरपालिका/नगरपालिका/नगरपरिषद/नगरपंचायती यांनी दिनांक २६ नोव्हेंबर, २०१९ आणि त्यांनतर वर्षभर मोहिमेच्या दरम्यान नागरिकांच्या कर्तव्यबाबत संबंधीत नागरि स्थानिक स्वराज्य संस्थांच्या व नागरिकांच्या सभा घ्याव्यात.<br>• नागरिकांच्या कर्तव्याला केंद्रीत करुन मोहिम आयोजित करावी. उदा.चर्चासत्र, सभा, सेमिनार, रॅली, वॉक्स मॅराथान दौड, पदयात्रा,<br>• मोहिमेच्या कालावधीत संबंधीत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या संकेतस्थळाद्वारे तसेच पत्रकाद्वारे, स्टँडीजद्वारे जागरुकता मोहिम राबविणे. |
| २. | शालेय शिक्षण विभाग | • दि.२६ नोव्हेंबर या दिवशी संविधानाच्या उद्देशिकेचे शाळेचे प्रांगण, मुख्य हॉल, शालेय सभागृह या ठिकाणी सामुहिकपणे वाचन करण्यात यावे.<br>• दि.२६ नोव्हेबर, २०१९ रोजी सर्व शाळेत जागरुकता मोहिम कार्यक्रमांच्या पत्रकांचे वाटप करण्यात यावे.<br>• मोहिमेच्या दरम्यान विद्यार्थ्यांकडून mock Parliament/ mock state assembly आयोजित करावी.<br>• राज्यस्तर व जिल्हास्तरावर भारतीय संविधानातील विषयाच्या अनुषंगाने नागरिकांच्या कर्तव्याबाबत चर्चासत्र, वादविवाद, निबंध स्पर्धा, सांस्कृतिक कार्यक्रमांचे आयोजन करण्यात यावे आणि विजेत्या स्पर्धकांना राज्यस्तरावर पारितोषिक देण्यात यावे. |

| | | |
|---|---|---|
| | | • सदर मोहिमेच्या दरम्यान सर्व स्तरावर चित्रकला स्पर्धा, क्विज (quiz), स्किट, ऑलम्पियाड स्पर्धाचे आयोजन करण्यात येऊन सदर स्पर्धामध्ये सहभागी विद्यार्थ्यांना प्रोत्साहन देण्यात यावे.<br>• सदर मोहिमेदरम्यान शाळेमध्ये नागरीकांची कर्तव्य व इतर संबंधित विषयाच्या अनुषंगाने प्रतिथयश व ख्यातनाम विधीज्ञ यांचे चर्चासत्र आयोजित करावे.<br>• भारतीय संविधान आणि डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांच्या जीवन चरित्रावर सांस्कृतिक कार्यक्रम व प्रदर्शनाचे आयोजन करावे.<br>• ख्यातनाम व्यक्तींना नागरीकांचे कर्तव्य या विषायवर लोकांमध्ये जणजागृती करण्यासाठी सदर मोहिमेदरम्यान आमंत्रित करावे.<br>• शालेय पुस्तकामध्ये भारतीय संविधानाच्या उदेशिकेबरोबरच एका पानाचा समावेश असलेले नागरिकांचे मुलभूत कर्तव्य छापण्यात यावीत.<br>• सदर मोहिमेदरम्यान नॅशनल इन्स्टीटयुट ऑफ ओपन स्कुलमध्ये शिकणारे विद्यार्थी व कर्मचारी वर्ग यांच्यामध्ये नागरिकांच्या कर्त्यव्याबाबत प्रचार करावा.<br>• सदर मोहिमेच्यादरम्यान नागरिकांच्या कर्तव्याबाबत चर्चासत्र/ सेमिनार/कार्याशाळा/मेळावा/मॅराथॅान/पदयात्रा यांचे आयोजन करावे.<br>• मोहिमेच्या कालावधीत विभागाच्या संकेतस्थळाद्वारे, पत्रक व स्टँडीजद्वारे नागरिकांच्या कर्तव्याबाबत प्रचार करावा. |
| ३) | उच्च व तंत्रशिक्षण विभाग | • दि.२६ नोव्हेंबर २०१९ या दिवसी शासकीय तथा खाजगी महाविद्यालये / संस्था व केंद्र या ठिकाणी विशेष सभेचे आयोजन करून संविधानाच्या उद्देशिकेचे सामुहिकपणे वाचन करण्यात यावे.<br>• सदर मोहिमेच्या दरम्यान शासकीय तथा खाजगी महाविद्यालये / संस्था / केंद्र या ठिकाणी वादविवाद स्पर्धा, निबंध लेखन स्पर्धा व प्रश्नोत्तर स्पर्धाचे आयोजन करावे.<br>• सदर मोहिमेच्या दरम्यान महाविद्यालयात सर्व स्तरावर नागरिकांच्या कर्तव्याबाबत चर्चासत्र / सेमिनार, यांचे आयोजन करण्यात यावे.<br>• विधीशी संबंधित विद्यापिठे/ महाविद्यालये यांच्या मार्फत नागरीकांच्या कर्त्यव्याबाबत त्यांच्या कार्यक्षेत्रातील शाळांमध्ये (इयत्ता ८ वी पर्यंत तथा व इयत्ता ८ वी च्या पुढील |

| | | |
|---|---|---|
| | | विद्यार्थ्यांसाठी प्रत्येकी एक अशा दोन) Power Point presentation तयार करुन त्याचे सादरीकरण करावे.<br>• सदर मोहिमेच्यादरम्यान नागरीकांच्या कर्त्यव्ये केंद्र स्थानी ठेवुन चर्चासत्र/ सेमिनार/ कार्याशाळा/मेळावा /मॅराथॅान/पद यात्रा यांचे आयोजन करणे.<br>• संपुर्ण मोहिमेच्या कालावधीत संकेतस्थळाद्वारे पत्रके व स्टँडीजद्वारे जागरुकता मोहिम राबवावी. |
| ४) | विधी व न्याय विभाग | • दि. २६-११-२०१९ रोजी राज्य बार कौन्सिल/ जिल्हा बार संघटना/ विधी महाविद्यालये येथे उदेशिकेचे वाचन करावे.<br>• दि.२६ नोव्हेंबर २०१९ रोजी आणि सदर मोहिमेच्या दरम्यान राज्य बार कौन्सिल/ जिल्हा बार संघटना यानी संविधान दिन व नागरीकांची कर्त्यव्ये याबाबत चर्चासत्र/ सेमिनार/ कार्याशाळा/मेळावा यांचे आयोजन करणे.<br>• राज्य बार कौन्सिल/ जिल्हा बार संघटना यांनी भारताचे संविधान व नागरीकांचे कर्त्यव्य या विषयावर चर्चासत्र व व्याख्यान देणा-या माहितगार व्यक्तींचा शोध घेवून शाळा व महाविद्यालयामध्ये आयोजन करण्यात यावे.<br>• विधीशी संबंधित विद्यापिठे/ महाविद्यालये यांच्या मार्फत नागरीकांच्या कर्त्यव्याबाबत त्याच्या कार्य क्षेत्रातील शाळांमध्ये ( इयत्ता ८ वी पर्यंत तथा इयत्ता ८ वी च्या पुढील विद्यार्थ्यांसाठी प्रत्येकी एक अशा दोन) Power Point presentation तयार करुन त्याचे सादरीकरण करावे.<br>• संपुर्ण मोहिमेच्या कालावधीत संकेतस्थळाद्वारे पत्रके व स्टँडीजद्वारे जनजागरुकता मोहिम राबवावी.<br>• राज्य/जिल्हा/विधी सेवा प्रधिकरण आणि विधी महाविद्यालयातील Legal Aid Clinic यांच्या मार्फत जनजागृती शिबिरांचे आयोजन करावे. |
| ५) | क्रिडा व युवक कल्याण विभाग (शालेय शिक्षण विभागा अंतर्गत) | • दि.२६ नोव्हेंबर २०१९ या दिवशी नेहरू युवा केंद्र (NYK) / राष्ट्रीय सेवा दल (NSS) यांनी संविधानाच्या उद्देशिकेचे वाचन करून व जनजागृती, पदयात्रा व मेळावे आयोजित करावेत.<br>• संकेतस्थळाद्वारे पत्रके व स्टँडी याद्वारे जनजागरुकता मोहिम राबवावी. |

| | | |
|---|---|---|
| | | • सदर मोहिमेच्यादरम्यान नागरीकांच्या कर्त्यव्ये केंद्र स्थानी ठेवुन चर्चासत्र/ सेमिनार/ कार्याशाळा/मेळावा /मॅराथॅान/पद यात्रा यांचे आयोजन करणे. |
| ६) | ग्रामविकास विभाग | • दि.२६ नोव्हेंबर २०१९ या दिवशी ग्रामपंचायत प्रमुखाव्दारे (सरपंच) विशेष ग्राम सभेचे आयोजन करून संविधानाच्या उद्देशिकेचे वाचन करावे.<br>• मोहिमे दरम्यान ग्राम पंचायत स्तरावर बैठक घेवून केंद्र शासनाच्या महत्वाच्या विविध योजनाबाबतच्या माहितीचे लोकांसमोर वाचन करण्यात यावे.<br>• २६.११.२०१९ रोजी व मोहिमे दरम्यान स्वंयसहाय्यता व ग्रामिण युवा क्लब यांची बैठक आयोजित करावी.<br>• सदर मोहिमेच्यादरम्यान नागरीकांची कर्तव्य केंद्रस्थानी ठेवून चर्चासत्र/ सेमिनार/ कार्याशाळा/मेळावा /मॅराथॅान/पदयात्रा यांचे आयोजन करावे.<br>• संपुर्ण मोहिमेच्या कालावधीत संकेतस्थळाद्वारे पत्रके व स्टँडीज याद्वारे जनजागरुकता मोहिम राबवावी. |
| ७) | पर्यटन विभाग (सामाजिक न्याय विभाग, महाराष्ट्र शासन तथा भारतीय रेल्वे यांचे सोबत संयुक्तीक समन्वयाने) | • केंद्र शासनाने डॅा. बाबासाहेब आंबेडकर यांच्या जीवनाशी निगडित स्थळे पंचतिर्थ म्हणून घोषित करण्यात आलेले आहे. ( डॅा. बाबासाहेब आंबेडकर यांचे महू येथील जन्मस्थळ, लंडन येथील शिक्षाभुमी, नागपूर येथील दिक्षाभुमी, दिल्ली येथील महापरिनिर्वाण स्थळ आणि मुंबई येथील चैत्यभुमी) येथे शालेय विद्यार्थी, युवा यांची विशेष भेट /सहल आयोजित कारावी.<br>• राज्यातील सर्व पर्यटन स्थाळावर मोठ्या प्रमाणावर प्रचार व प्रसिध्दीव्दारे (IEC material) जनजागरुकता मोहिम राबवावी. |
| ८) | संसंदिय कार्य विभाग | • दि.२६.११.२०१९ रोजी संसदीय कार्य विभागाने संविधान दिनाचा कार्यक्रम आयोजित करावा.<br>• दि. २६.११.२०१९ या दिवशी विधीमंडळाच्या इमारतीस रोषनाई व सजावट करावी.<br>• सदर मोहिमेच्यादरम्यान नागरीकांच्या कर्त्यव्ये केंद्र स्थानी ठेवुन चर्चासत्र/ सेमिनार/ कार्याशाळा/मेळावा /मॅराथॅान/पद यात्रा यांचे आयोजन करणे.<br>• संपुर्ण मोहिमेच्या कालावधीत संकेतस्थळाद्वारे पत्रके व स्टँडीज याद्वारे जनजागरुकता मोहिम राबवावी. |

| | | |
|---|---|---|
| ९) | गृह विभाग | • दि.२६ नोव्हेंबर २०१९ या दिवशी गृह विभागा अंतर्गत सर्व कार्यालये (शासकीय /निमशासकीय) तथा सर्व पोलीस स्टेशन येथे संविधानाच्या उद्देशिकेचे वाचन करण्यात यावे.<br>• सदर मोहिमेच्या दरम्यान नागरीकांची कर्तव्य केंद्रस्थानी ठेवून चर्चासत्र/ सेमिनार/ कार्याशाळा/मेळावा /मॅराथॅान/पदयात्रा यांचे आयोजन करावे.<br>• संपुर्ण मोहिमेच्या कालावधीत संकेतस्थळाद्वारे पत्रके व स्टँडीज याद्वारे जनजागरुकता मोहिम राबवावी. |
| १०) | माहिती व तंत्रज्ञान विभाग | • सदर मोहिमेबाबतच्या प्रसिध्दीचे बॅनर सर्व शासकीय, निमशासकीय, स्वायत्त संस्था, सार्वजनिक क्षेत्रातील संस्थांच्या संकेतस्थळावर प्रदर्शित करावे.<br>• मोहिमेमध्ये online Quiz, online contest व Facebook live talk आयोजित करावे. यासाठी नागरिकांच्या सहभागासंदर्भात प्रसिध्दी करावी.<br>• समाजमाध्यमावर (Social Media) नागरिकांच्या कर्तव्याबाबत Citizens duties-#Itsmyduty हा हॅशटॅग वापरुन नागरिकांच्या कर्तव्याबाबतचा व्हिडीओ तयार करुन त्याला मोठया प्रमाणात शेअर करावे व “#Itsmyduty” या हॅशटॅगवर नागरिकांचे अनुभवांना समाजमाध्यमातून प्रसिध्दी द्यावी.<br>• सदर मोहिमेच्या दरम्यान सर्व शासकीय /निमशासकीय संकेतस्थळावर भारतीय संविधान व नागरिकांचे कर्तव्य याबाबतचे बोधचिन्ह (Logo) व टॅगलाईन प्रदर्शित करावी.<br>• सदर मोहिमेच्या दरम्यान नागरीकांची कर्तव्य केंद्रस्थानी ठेवून चर्चासत्र/ सेमिनार/ कार्याशाळा/मेळावा /मॅराथॅान/पदयात्रा यांचे आयोजन करावे.<br>• संपुर्ण मोहिमेच्या कालावधीत संकेतस्थळाद्वारे पत्रके व स्टँडीज याद्वारे जनजागरुकता मोहिम राबवावी. |
| ११. | माहिती व जनसंपर्क महासंचालनालय - (सा.प्र.वि.) | • रविवार, दि.२४.११.२०१९ रोजी मा.पंतप्रधान यांच्या नागरिकांची कर्तव्य या विषयासंदर्भात “मन की बात” या कार्यक्रमाची मोठया प्रमाणात प्रसिध्दी द्यावी.<br>• राज्य तथा जिल्हा स्तरावरच्या मोहिमे दरम्यान घेतलेल्या कार्यक्रमांचे थेट प्रक्षेपण करावे.<br>• आकाशवाणी तथा दुरदर्शनने लघुपटाचे प्रसारण करावे.<br>• मोहिमे दरम्यान संविधान दिन संदर्भात माहितीपट प्रदर्शित व प्रसारीत करावे. |

| | | |
|---|---|---|
| | | • सर्व प्रसार माध्यमांद्वारे भारतीय राज्यघटनेतील नागरिकांची कर्तव्य या संदर्भात मुलाखती, चर्चासत्र, टॉक शो, प्रसिध्द व्यक्तीद्वारे संदेश या संदर्भात लघुपट तयार करुन त्याच्या उदघाटनांच्या कार्यक्रमांचे (curtain raiser activities) कार्यक्रमाचे आयोजन करावे.<br>• संविधान दिनाचे बोधचिन्ह ठळक ठिकाणी संकेतस्थळावर, विविध टिव्ही चॅनेल्सवर प्रदर्शित करावे.<br>• मोहिमे दरम्यान नागरिकांच्या कर्तव्यासंदर्भात कमीतकमी ७० प्रसिध्द नागरिकांचे बाईट्स घेण्यात यावेत व त्या एकत्रित करुन लघुपट व व्हिडीओ क्लिप तयार करुन त्याला व्यापक प्रसिध्दी द्यावी. तसेच एखाद्या नागरिकाद्वारे बजावण्यात आलेल्या कर्तव्यामुळे समाजाला झालेला फायदा विविध प्रसार माध्यामाद्वारे प्रदर्शित करावा.<br>• दि.२६.११.२०१९ आणि त्यानंतर मोहिमे दरम्यान खाजगी प्रसार माध्यमे यांच्याशी समन्वय व सुसंवाद साधावा.<br>• भारतीय राज्यघटनेचे महत्व व त्याची मुल्य, संविधानाची उद्देशिका व नागरिकांचे कर्तव्य यांच्या महत्वासंदर्भात लाईव्ह रेडिओ कार्यक्रम सादर करावेत.<br>• सर्व समाज माध्यमांचा वापर करुन मोहिमे दरम्यान भारतीय राज्यघटने संदर्भात व्हिडीओ व प्रसिध्दी साहित्य अपलोड करावे.<br>• सदर मोहिमेच्या दरम्यान नागरीकांची कर्तव्य केंद्रस्थानी ठेवून चर्चासत्र/सेमिनार/कार्याशाळा/मेळावा/मॅराथॅान/पदयात्रा यांचे आयोजन करावे.<br>• संपुर्ण मोहिमेच्या कालावधीत संकेतस्थळाद्वारे पत्रके व स्टँडीज याद्वारे जनजागरुकता मोहिम राबवावी. |
| १२. | राज्यातील इतर सर्व शासकीय विभाग | • दि.२६ नोव्हेंबर या दिवशी संविधानाच्या उद्देशिकेचे राज्यातील सर्व शासकीय/निमशासकीय कार्यालयांमध्ये सामुहिकपणे वाचन करण्यात यावे.<br>• सदर मोहिमेच्या दरम्यान नागरीकांची कर्तव्य केंद्रस्थानी ठेवून चर्चासत्र/ सेमिनार/ कार्याशाळा/मेळावा /मॅराथॅान/पदयात्रा यांचे आयोजन करावे.<br>• संपुर्ण मोहिमेच्या कालावधीत संकेतस्थळाद्वारे पत्रके व स्टँडीज याद्वारे जनजागरुकता मोहिम राबवावी. |